कल्याण जिल्हा कारागृह येथे १२२ अतिरिक्त शौचालये बांधण्यासाठी येणा-या खर्चास व अंदाजपत्रके व नकाशास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

शासन निर्णय क्रमांक : बीएलडी २००५/प्र.क्र.११३/पीआरएस-२
मंत्रालय, मुंबई-४०००३२, दिनांक :२२ ऑगस्ट, २००५.

वाचा:-१) कारागृह महानिरीक्षक यांचे अ.शा.पत्र क्र.बीएलडी/कजिका/१५७२/२००५/६०९६/कक्ष-३, दि.१४.६.२००५.
२) कारागृह महानिरीक्षक यांचे अ.शा.पत्र क्रं.बीएलडी/शौचालये/०५/७२२७/कक्ष-३, दि.२८.७.२००५.

<u>शासन निर्णय</u> :-कल्याण जिल्हा कारागृह येथे शौचालये बांधण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. या संदर्भात असे नमूद करण्यात येते की, मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल झालेल्या याचिका क्र.३८६/२००४ प्रकरणी मा.न्यायालयाने कारागृहातील बंद्याच्या अधिकृत क्षमतेपेक्षा जादा बंदी संख्येनुसार स्वच्छताविषयक बाबी परिपूर्ण असाव्यात असे निर्देश दिलेले असून कारागृह नियमावलीत विनिर्दिष्ट केल्यानुसार प्रत्येक कारागृहाच्या बंदी क्षमतेच्या प्रमाणात अतिरिक्त शौचालये बांधण्याचे आदेश दिले आहेत. त्यानुसार राज्यातील सर्व कारागृहात बंदी क्षमतेच्या प्रमाणात अतिरिक्त शौचालये बांधावी लागणार आहेत. त्या अनुषंगाने कल्याण जिल्हा कारागृह येथे एकूण १५१ अतिरिक्त शौचालये बांधणे आवश्यक असल्यामुळे कारागृह महानिरीक्षकांनी उपरोक्त संदर्भाधिन पत्रान्वये सदर १५१ शौचालये बांधण्यासाठी लागणा-या रु.५६,६५,१८०/- इतक्या खर्चाचा प्रस्ताव व अंदाजपत्रक आणि नकाशे प्रशासकीय मान्यतेसाठी शासनास सादर केले होते. तथापि दि.२८.७.२००५ च्या पत्रान्वये कारागृह महानिरीक्षक यांनी कल्याण जिल्हा कारागृह येथे १५१ ऐवजी १२२ अतिरिक्त शौचालये बांधणे आवश्यक असल्याचे कळविले आहे. त्यानुसार कल्याण जिल्हा कारागृह येथे शौचालये बांधण्यासाठी शासनास सादर केलेल्या प्रस्तावातील १२२ शौचालये बांधण्यासाठी येणा-या रु.४५,७७,१६५/- (रुपये पंचेचाळीस लाख सत्त्याहत्तर हजार एकशे पासष्ट फक्त) इतक्या खर्चास व अंदाजपत्रके आणि नकाशास शासन या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देत आहे.

२. यासाठी होणारा खर्च मागणी क्र.एच, मुख्य लेखाशिर्ष "४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च, १०१ बांधकाम पंचवार्षिक योजनातर्गत योजना, प्रमुख

बांधकाम (००) (१०) तुरुंग (४०५९-०११७) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाचे शासन निर्णय क्र.विअप्र १०००/प्र.क्र.४६/ २००१/विनियम, दि.११ जुलै, २००१ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उप विभाग पाचच्या परिशिष्ठामधील अनु.क्र.१ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्ममित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

आगपरदेशी

( आ. ग. परदेशी )

कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन,गृह विभाग.

प्रत,

कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य, पुणे
कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, पुणे
कारागृह उपमहानिरीक्षक, दक्षिण विभाग, मुंबई.
अधिक्षक, कल्याण जिल्हा कारागृह, कल्याण.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.
कार्यकारी अभियंता, ठाणे बांधकाम विभाग, ठाणे.
उप विभागीय अभियंता, कल्याण (सा.बां.) उप विभाग क्र.१, कल्याण.
श्री.बी.आर.कांबळे, उप अभियंता, कारागृह महानिरीक्षणालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
उप सचिव, इमारती-२, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
अवर सचिव,बीयुडी-१,गृह विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
निवड नस्ती,पीआरएस-२,गृह विभाग,मंत्रालय,मुंबई-३२

****